**पुणे व पिंपरी-चिंचवड सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तांत्रिक दस्तऐवजाचे निरीक्षण व मार्गदर्शन तसेच ADSL कं. च्या कामावर देखरेख ठेवण्यासाठी तांत्रिक समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-३६१५/प्र.क्र. १९८ / पोल-३**

२ रा मजला, मुख्य इमारत ,मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ५ जून, २०१५.

**वाचा :**

१) गृह विभाग शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७ जुलै, २०११.

२) गृह विभाग शासन निर्णय क्र. आयएसएस १०१२/ प्र क ७१/ विशा-४, दि. १४.१०.२०१३.

३) पुणे व पिंपरी-चिंचवड सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात आढावा बैठकीचे इतिवृत्त, दि. ८.५.२०१५.

४) पोलीस आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. सीबी-६/सीसीटीव्ही प्रोजेक्ट/पीआयसी/२०१५, दि. ३०.५.२०१५.

**प्रस्तावना :-**

पुणे व पिंपरी-चिचंवड शहरातील सुरक्षेच्या दृष्टीकोनातून कार्यान्वित करण्यात येणाऱ्या सीसीटीव्ही प्रकल्पाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी तांत्रिक बाबीसंदर्भात सल्ला देण्यासाठी तांत्रिक समिती गठित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

दहशतवाद व तत्सम विरोधी उपाययोजनांवर निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीची स्थापना दि. २७.७.२०११ रोजी करण्यात आली. या शक्तीप्रदान समितीच्या दि. १३.९.२०१३ रोजीच्या बैठकीत पुणे व पिंपरी-चिंचवड शहरातील सुरक्षेच्या दृष्टीकोनातून सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वित करण्याचा निर्णय घेतला.

२. त्यानुसार पुणे व पिंपरी-चिंचवड शहरातील सुरक्षेच्या दृष्टीकोनातून कार्यान्वित करण्यात येणाऱ्या सीसीटीव्ही प्रकल्पाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि. ८.५.२०१५ रोजीच्या आढावा बैठकीत झालेल्या चर्चेनुसार प्रकल्पाच्या तांत्रीक दस्तऐवजाचे निरीक्षण, मार्गदर्शन व ADSL कं.च्या कामावर देखरेख ठेवण्यासाठी तांत्रिक समितीची स्थापना करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार पुढीलप्रमाणे तांत्रिक समिती गठीत करण्यात येत आहे.

१) पोलीस आयुक्त, पुणे — अध्यक्ष

२) बिनतारी विभाग, पोलीस आयुक्त कार्यालय, पुणे यांचे प्रतिनिधी सदस्य
३) माहिती तंत्रज्ञान विभाग, महाराष्ट्र शासन यांचे प्रतिनिधी सदस्य
४) डॉ. संजय ए. पाटील, विभागप्रमुख, एमआरएसएसी, पुणे सदस्य
५) नॅशनल इन्फॉरमॅटीक्स सेंटर (NIC), पुणे यांचे प्रतिनिधी सदस्य
६) पुणे महानगरपालिका, आयटी विभाग (PMC-IT) यांचे प्रतिनिधी सदस्य
७) इंजिनिअरींग कॉलेज, पुणे (COEP) यांचे प्रतिनिधी सदस्य
८) पोलीस उप आयुक्त (मुख्यालय), पुणे सदस्य-सचिव

३. सदरहू समिती प्रकल्प पूर्णपणे कार्यान्वित होईपर्यंत कार्यरत राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६११५८३४४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.06.06 12:02:14 +05'30'

(द. ह. कदम)
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, पुणे
४) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
५) आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
६) डॉ. संजय ए. पाटील, विभाग प्रमुख, एमआरएसएसी, पुणे विद्यापीठ रोड, शिवाजीनगर, पुणे-४११००५
७) नॅशनल इन्फॉर्मेटीक्स सेंटर (NIC),जिल्हा माहिती केंद्र, जिल्हाधिकारी कार्यालय कॅम्पस,ससुन हॉस्पिटल समोर, पुणे-४११००१
८) कॉलेज ऑफ इंजिनिअरींग (COEP),वेलेस्ले रोड,शिवाजीनगर, पुणे-४११००५

**प्रत: माहितीसाठी**

१) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) अप्पर मुख्य सचिव (गृह) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग,

३) प्रधान सचिव (विशेष) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग

४) मे. प्राईसवॉटरहाऊस कुपर्स लि. मुंबई.

५) निवडनस्ती, पोल-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई .